राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत सन २०२३-२४ या वर्षात ऊसतोडणी यंत्रास अनुदान प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- ससाका-०७२२/प्र.क्र. २१६ /२५-स,**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२
दिनांक :३० /०६/२०२३.

**संदर्भ :**१) केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र. F.No.१-१५ /२०२२-RKVY, दि. ०८ डिसेंबर २०२२.

२) राष्ट्रीय कृषी विकास योजनेअंतर्गत ३२ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या दि.११/०१/२०२३ रोजी झालेल्या बैठकीस अनुसरुन कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विकास विभागाचे क्र. संकीर्ण-२०२२/ प्र.क्र.१६८/पार्ट-१/१४-ऄ, दि.३०/०१/२०२३ चे इतिवृत्त.

३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, समक्रमांक दि.२०/०३/२०२३

४) साखर आयुक्तालयाचे पत्र जा.क्र.साआ/विकास /कक्ष ११/ RKVY प्र.मा / २२७/२०२३, दि.२५ मे, २०२३

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय कृषी विकास योजनेअंतर्गत केंद्र शासनाने प्रसिद्ध केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दि. २० सप्टेंबर, २००७ च्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समिती (SLSC) गठित करण्यात आलेली आहे. त्यानुसार मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीची ३२ वी बैठक दि. ११ जानेवारी, २०२३ रोजी पार पडली. या बैठकीमध्ये ऊस तोडणीतील मजुरांच्या समस्येवर मात करण्यासाठी व ऊसाच्या गाळपासाठी होणारा विलंब टाळण्याच्या अनुषंगाने सन २०२२-२३ मध्ये ४५० व सन २०२३-२४ मध्ये ४५० अशा एकूण ९०० ऊस तोडणी यंत्र खरेदीसाठी अनुदान देण्याच्या प्रकल्पासाठी रुपये ३२१.३० कोटी एवढ्या प्रकल्प किंमतीस मान्यता देण्यात आली आहे. त्या अनुषंगाने राष्ट्रीय कृषी विकास योजनेअंतर्गत सन २०२२-२३ व सन २०२३-२४ मध्ये ऊस तोडणी यंत्रास अनुदान देणे बाबत दि. २०.०३.२०२३ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. आर्थिक वर्ष संपण्यास अल्पावधी शिल्लक असताना सदरचा शासन निर्णय निर्गमित झाल्याने सन २०२२-२३ मधील ४५० ऊस तोडणी यंत्रांचे लक्षांक हे चालू आर्थिक वर्ष २०२३-२४ मध्ये वर्ग करून आर्थिक वर्ष २०२३-२४ मध्ये सन २०२२-२३ मधील ४५० व चालू आर्थिक वर्ष सन २०२३-२४ मधील ४५० अशा एकूण ९०० ऊस तोडणी यंत्रांना अनुदान देणेबाबतच्या रू.३२१.३० कोटी इतक्या रकमेच्या प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय कृषी विकास योजनेअंतर्गत ३२ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या दि.११/०१/२०२३ रोजी झालेल्या बैठकीस अनुसरून कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विकास विभागाचे क्र.संकीर्ण-२०२२/ प्र.क्र.१६८/पार्ट-१/१४-अे, दि.३०/०१/२०२३ चे

इतिवृत्तात मंजुरी दिल्याप्रमाणे खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार रूपये ३२१.३० कोटी रकमेच्या प्रकल्प प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | आर्थिक वर्ष | ऊसतोडणी यंत्र संख्या | प्रति ऊस तोडणी यंत्राची किंमत रू.९० लाख ग्राहय धरून होणारी प्रकल्पाची एकूण किंमत (रू. कोटी) | एकूण अनुदान (यंत्र किंमतीच्या ४०% अथवा रू.३५ लाख कमाल मर्यादा) | केंद्र शासन हिस्सा (६० %) | राज्य शासन हिस्सा (४०%) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | २०२२-२३ | ४५० | ४०५.०० | १५७.५० | ९४.५० | ६३.०० |
| २. | २०२३-२४ | ४५० | ४०५.०० | १५७.५० | ९४.५० | ६३.०० |
| एकूण | | ९०० | ८१०.०० | ३१५.०० | १८९.०० | १२६.०० |
| प्रशासकीय खर्च २% | | | ६.३० | ६.३० | ३.७८ | २.५२ |
| एकूण | | ९०० | ८१६.३० | ३२१.३० | १९२.७८ | १२८.५२ |

१.सन २०२३-२४ या वर्षात राष्ट्रीय कृषी विकास योजनेअंतर्गत ऊस तोडणी यंत्रास अनुदान हा प्रकल्प राज्यात राबविण्यासाठी रू. ३२१.३० कोटी निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२.प्रस्तुत प्रकल्प राष्ट्रीय कृषी विकास योजनेच्या माध्यमातून राबविण्यात येत असून त्या योजनेच्या निकषानुसार मंजूर निधीपैकी केंद्र शासनाचा हिस्सा ६० टक्के व राज्य शासनाचा हिस्सा ४० टक्के राहील.

३. सदर प्रकल्प राबविण्याच्या सविस्तर मार्गदर्शक सूचना साखर आयुक्त यांनी निर्गमित कराव्यात.

४. सदर प्रकल्पाची अंमलबजावणी “महाडीबीटी” पोर्टलद्वारे करावी.

५.लाभार्थ्याकडून अर्ज महाडीबीटी पोर्टलवर स्विकारून ऑनलाईन सोडतीद्वारे (Lottery) लाभार्थ्याची निवड करावी.

६.सदर प्रकल्प राबविण्यासाठी साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य अंमलबजावणी यंत्रणा म्हणून काम पाहतील. साखर आयुक्तांनी सदर प्रकल्प राबविताना त्याची अंमलबजावणी, संनियंत्रण आणि मुल्यमापन करणेबाबत सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग /कृषी विभाग यांच्याशी आवश्यक तो समन्वय ठेवावा. तसेच वेळोवेळी प्रकल्प अंमलबजावणी विषयक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल सहकार विभागास/ कृषी विभागास सादर करावा.

७.वरील प्रकल्पाची अंमलबजावणी, संनियंत्रण व मुल्यमापन केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या निकषांनुसार साखर आयुक्त यांनी करावी.

८. साखर आयुक्त यांनी प्रस्तुत प्रकल्प अंमलबजावणीच्या अनुषंगाने राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीने तसेच केंद्र शासनाने दिलेल्या निर्देशाप्रमाणे आवश्यक कार्यवाही करावी.

९. या प्रकल्पाकरिता उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र साखर आयुक्त यांच्या स्वाक्षरीने किंवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्याच्या स्वाक्षरीने कृषी विभागास व सहकार विभागास सादर करावे.

१०.याबाबत सर्व वित्तीय नियम, विनियम, वित्तीय शासन निर्णय, अधिसूचना, आदेश, केंद्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश व भारताचे नियंत्रक व महालेखा परीक्षक यांचे या संदर्भातील निरीक्षण यांचे पालन होईल आणि खर्चात अनियमितता होणार नाही याबाबत योग्य ती दक्षता साखर आयुक्तालयाने घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०६३०१७५०१७७१०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHINGADE ANKUSH PANDURANG

Digitally signed by SHINGADE ANKUSH PANDURANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2,
pseudonym=18BA78965A42BF3AA081DE760471DB6306C88F1D,
serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D173346155B9208DCD97DD078B, cn=SHINGADE ANKUSH PANDURANG
Date: 2023.06.30 17:53:44 +05'30'

**( अंकुश पां. शिंगाडे )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
५) मा.मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
७) अपर मुख्य सचिव ( वित्त ) , मंत्रालय, मुंबई-३२.
८) अपर मुख्य सचिव ( सहकार व पणन ) , मंत्रालय, मुंबई-३२
९) अपर मुख्य सचिव (कृषी) कृषी पशु संवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्सव्यवसाय विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) प्रधान सचिव ( नियोजन ), मंत्रालय, मुंबई-३२.
११)साखर आयुक्त ,पुणे ,महाराष्ट्र राज्य,पुणे.
१२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ मर्या.,मुंबई
१३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या.मुंबई.
१४) महासंचालक, वसंतदादा साखर संस्था, मांजरी, पुणे
१५) महालेखापाल, महाराष्ट्र १ /२ (लेखा परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१६) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१७) कक्ष अधिकारी (आरकेव्हीवाय कक्ष) कृषी पशु संवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्सव्यवसाय विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
१८) निवडनस्ती २५-स